**आलेवाडी बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता. संग्रामपुर जि.बुलढाणा या प्रकल्पास रु.२०५.६१ कोटी इतक्या किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१९/(४२९/२०१९)/ ल.पा.**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक-१० मार्च, २०२३

पहावे :-

१) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे जा.क्र.७०६१/कातां-३/आलेवाडी/२०१९, दि.२९/०८/२०१९ चे पत्र.
२) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे जा.क्र.५५३/कातां-३(२)/आलेवाडी सुप्रमा/२०२०, दि.२७/०१/२०२० चे पत्र.
३) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे जा.क्र.२९०८/कातां-३(२)/आलेवाडी सुप्रमा/२०२०, दि.३०/०६/२०२० चे पत्र.
४) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे जा.क्र.७१८१/विपाविम/कातां-३(२)/अरकचेरी/प्रथम सुप्रमा/२०२२, दि.२९/०९/२०२२ चे पत्र.
५) रा.तां.स.स.,नाशिक यांचे पत्र क्र.जा.क्र.रातांसस(१)/आलेवाडी बृलप्र/(धा.क्र.५६/२०२२)/८२२ दि.११/१०/२०२२

प्रस्तावना:-

आलेवाडी बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता.संग्रामपुर जि.बुलढाणा हा प्रकल्प विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर अंतर्गत बुलढाणा जिल्ह्यातील संग्रामपुर तालूक्यातील आलेवाडी गावाजवळ आडास नदीवर बांधण्यात येत आहे. या धरणाची एकूण साठवण क्षमता १०.७५४७ द.ल.घ.मी. आहे. या योजनेद्वारे बुलढाणा जिल्ह्यातील संग्रामपुर तालुक्यातील एकूण ०४ गावातील ७५० हेक्टर क्षेत्र सिंचनाखाली येणार आहे.

सदर योजनेस विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे निर्णय क्र.का.ता.७/६९/आलेवाडी. ल.पा./प्र.मा./(८८४/२००९) दि.२७/०२/२००९/ (दरसूची २००८-०९) अन्वये रु.३८.३२ कोटी इतक्या रकमेस दरसूची वर्ष २००८-०९ नुसार मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. या प्रकल्पाचे सन २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारीत रु.२०५.६१ कोटी इतक्या किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या दि.०८/०२/२०१९ रोजी झालेल्या १२७ व्या बैठकीत निर्णयार्थ सहमती दर्शविण्यात आली आहे. तसेच नियामक मंडळाने दि.१२/०६/२०१९ रोजीच्या बैठकीत सदर प्रस्तावास मा.मंत्री मंडळासमोर ठेवण्यास सहमती दर्शविली आहे.

त्यानुसार एकूण रु.२०५.६१ कोटी (दरसूची २०१७-१८) इतक्या किंमतीचा प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेच्या विचारार्थ सादर केला होता.

आलेवाडी बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता.संग्रामपुर जि.बुलढाणा हा प्रकल्प बळीराजा जलसंजीवनी योजनेत समाविष्ट आहे. प्रकल्पाच्या किंमतीत झालेली वाढ ही पुढील बाबींमुळे झाली आहे. दरसूची मध्ये झालेली वाढ, जास्त दराची निविदा, भूसंपादनातील वाढ, संकल्पचित्रातील बदल, अपुऱ्या तरतूदीमूळे, इतर कारणांमुळे व अनुषंगिक खर्च इत्यादीमुळे झालेली आहे. याचा विचार करता सदर प्रकल्प मापदंड पूर्ण करत नसला तरी खास बाब म्हणून या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु.२०५.६१ कोटी इतक्या किंमतीस मा.मंत्रीमंडळ बैठक दि.२०/१०/२०२२ मधील मान्यतेनुसार प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय खालीलप्रमाणे घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

आलेवाडी बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता.संग्रामपुर जि.बुलढाणा, या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु.२०५.६१ कोटी(दोनशे पाच कोटी, एकसष्ठ लक्ष फक्त) इतक्या किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी एकूण रु.१९४.४५ कोटी व अनुषंगीक खर्च ११.१६ कोटी) खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या प्रथम सु प्र मा प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.
२) राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने तांत्रिक छाननी अहवालात मुद्दा क्र. २६ व २७ मध्ये नमूद केलेल्या मुद्यांची पुर्तता करण्यात यावी.
३) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करता येणार नाही.
४) प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.
५) प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.
६) प्रकल्पाचे काम नियोजनानुसार पूर्ण करण्यात यावे.
७) बंदिस्त नलिका वितरण प्रणालीच्या आराखड्यास जलसंपदा विभाग शासन निर्णय दिनांक १३ ऑक्टोबर, २०१७ अन्वये आवश्यक असलेली कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांची तत्वत: मान्यता प्राप्त आहे. त्यास अंतिम मान्यता प्राप्त करावी व तदनंतरच या घटकावरील निविदा निश्चिती /खर्च करण्यात यावा.
८) सदर प्रकल्पास निधी उपलब्ध करुन देण्यापूर्वी महामंडळाने प्रकल्पावर "महाराष्ट्र सिंचन पद्धतींचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५" नुसार लाभधारकांची "पाणी वापर संस्था" स्थापन करणेसंदर्भात वेळेवर कार्यवाही करावी.
९) प्रकल्पाच्या उर्वरित कामांमध्ये धरण बांधकाम, भूसंपादन व बंदिस्त नलिका वितरण प्रणाली यांचा समावेश असल्याने प्रकल्पाच्या धरणाची शीर्ष कामे निधी उपलब्धतेनुसार प्राथम्याने पूर्ण करावीत.
१०) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपूर्णपणे महामंडळाची राहील.
११) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही.
१२) सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना शासनाने सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही व अशी कोणतीही सहमती/मान्यता शासनाने प्रस्तुत प्रकल्पाबाबत दिलेली नाही.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००)(०४) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ४९९२) लहान पाटबंधारे (कार्यक्रम) ५४ गुंतवणूका " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय दिनांक २०/१०/२०२२ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाचे निर्णयाच्या अनुषंगाने, जलसंपदा विभाग, प्रकल्प प्रथम कक्षाने दिनांक १७/०८/२०२१ अन्वये, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १८३/२०२१/कार्यासन १४३४, दिनांक ०३/११/२०२१ अन्वये, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.

४०६/२०२१/कार्यासन व्यय-१२, दिनांक ०८/१२/२०२१ अन्वये, तसेच मा. मुख्य सचिव यांचे दिनांक १७/१०/२०२२ अन्वये सहमती दिलेली आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २४० या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३१०१९२८४००९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.10 19:36:02 +05'30'

**(अमोल फुंदे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेते, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अपर मुख्य सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. जिल्हाधिकारी, बुलढाणा.
१४. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
१५. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती
१७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. सह सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. अधिक्षक अभियंता, बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा.
२०. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई
२१. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई
२२. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. ल.पा. कार्यासन (संग्रहार्थ).

परिशिष्ट-अ

आलेवाडी बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता. संग्रामपुर जि.बुलढाणा
प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता
शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१९/(४२९/२०१९)/ ल.पा. दिनांक: १०/०३/२०२३ चे परिशिष्ट
उपशिर्षनिहाय तरतूदी

| अ. क्र. | तपशील | मूळ प्र.मा.नुसार किंमत रू.कोटी (दरसूची २००८-०९) | प्रस्तावित सु.प्र.मा. नुसार किंमत रू. कोटी (दरसूची २०१७-१८) |
|---|---|---|---|
| १ | अ-प्राथमिक | ०.२१ | ०.०८ |
| २ | ब-भूसंपादन | | |
| | I. भूसंपादन | २.०९ | ८२.८० |
| | II. पुनर्वसन | -- | -- |
| ३ | सी-कामे | २९.१० | ९४.४८ |
| ४ | डि-विमोचक | ०.६५ | १.४८ |
| ५ | फ- आरएचटी | ०.१५ | ०.०० |
| ६ | एच- निर्गमन | ०.१० | ०.०० |
| ७ | के - इमारती | ०.०० | ०.०८ |
| ८ | एम-मातिकाम | ०.४५ | ०.०० |
| ९ | एम-वृक्षारोपण | ०.१५ | ०.४३ |
| १० | ओ-संकिर्ण | ०.१५ | ०.४३ |
| ११ | पी - देखभाल | ०.१५ | ०.४४ |
| १२ | यु- बंद नलिका वितरण (पुर्वी प्रवाही वितरण) | ०.३८ | १३.९८ |
| १३ | व्ही- शेतचारी | ०.७० | ०.०० |
| १४ | डब्लु- शेत निचरा | ०.७० | ०.०० |
| १५ | एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.२५ |
| | **एकूण** | **३५.०३** | **१९४.४५** |
| | **अनुषंगीक खर्च** | **३.२९** | **११.१६** |
| | **एकूण** | **३८.३२** | **२०५.६१** |

| अ. क्र. | निकष | प्रस्तावित सुप्रमा नुसार | मापदंड | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | लाभव्यय गुणोत्तर | ०.३१ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसत नाही. |
| २ | पाणीसाठ्याची किंमत प्रती सघमी | रु.१,९१,१८५/- | रु.१,२२,१३२/- | प्रकल्प मापदंडात बसत नाही. |
| ३ | आर्थिक परतावा दर | ४.१६ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसत नाही. |

AMOL BAPURAO FUNDE Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT Date: 2023.03.10 19:36:16 +05'30'

(अमोल फुंदे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन